**सामाजिक वनीकरण-वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण- सन २०१०-११ करीता पुरक मागणीद्वारे निधी वितरणास मंजूरी.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एसएलएफ-२०१०/प्र.क्र.१०३/जल-१२,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : १४ मार्च, २०११**

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र.एसएलएफ-१०९६/प्र.क्र.८४/जल-११, दि.३० ऑगस्ट, १९९६
२ )शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.एसएलएफ-२०१०/प्र.क्र.३८/जल-१२, दि.१६ एप्रिल,२०१०
३) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.एसएलएफ-२०१०/प्र.क्र.३८/जल-१२, दि.२६ ऑगस्ट,२०१०
४) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.एसएलएफ-२०१०/प्र.क्र.३८/जल-१२, दि.९ नोव्हेंबर,२०१०
५) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. पूरक- २०१०/प्र.क्र.२४० / अर्थसंकल्प -३, दि. ३० डिसेंबर, २०१०
६) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग,क्र.असक-२०१०/प्र.क्र.८१/जल-११, दि.१२ जानेवारी ,२०११
७) संचालक,सामाजिक वनीकरण, पुणे यांचे पत्र क्र. कक्ष-१/वाया/०९-१०/२२५९/२०१०-११, दि.२२.१०.२०१०

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्याला ७२० कि.मी. लांबीचा समुद्र किनारा लाभलेला असून समुद्र किना-याजवळ वालुकामय क्षेत्राचे एक आगळे सौदर्य व पर्यटनाच्या दृष्टीने महत्व आहे. दरवर्षी पावसाळयात समुद्राच्या पाण्याच्या लाटांमुळे किंवा भरतीच्या वेळी येत असलेल्या उधाणामुळे या वालुकामय क्षेत्राची बऱ्याच मोठया प्रमाणावर धुप होते व वाळू वाहून जाते. समुद्र किनाऱ्यावरील वालुकामय पट्टीचे धूपीपासून संरक्षण व्हावे म्हणून त्या क्षेत्रामध्ये वृक्ष लागवड करणे जरुरीचे आहे. समुद्र किनारी आतापर्यंत केलेल्या रोपवनांचे अनुभव लक्षात घेऊन सुरुच्या झाडांची लागवड केल्यास वालुकामय जमिन धरुन ठेवण्याच्या त्याच्या क्षमतेमुळे जमिनीची धूप थांबण्यास मदत झाल्याचे दिसून आले आहे व किनापट्टीवरील गावांचे मोठया प्रमाणावर संरक्षण झाले आहे.

**वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण** ही योजना राज्यात १९९६-९७ पासून राबविण्यात येत आहे. सदर योजना सन २०१०-११ या आर्थिक वर्षात पुढे चालू ठेवण्यासाठी मान्यता देण्यात आली असून, याकरीता रु. २५.०० लाख इतका निधी मंजूर करण्यात आला होता. सदर निधीपैकी ८०% निधी वरील संदर्भ क्र. (२) (३) व (४) मधील शासन निर्णयान्वये टप्या- टप्याने वितरीत करण्यास मान्यता दिली आहे.

आता, सामाजिक वनीकरणांतर्गत -वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण" या योजनेकरीता सन २०१०-११ या आर्थिक वर्षामध्ये डिसेंबर,-२०१० च्या हिवाळी अधिवेशनात पूरक मागणीद्वारे रु.३७.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यास मान्यता दिली असुन, सदर मंजूर निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सदर शासन निर्णयान्वये **"वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण"** या योजनेसाठी सन २०१०-११ या वर्षाकरीता पुरक मागणीद्वारे मंजूर झालेल्या निधीपैकी रु. ३५.८० लाख इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१०-११ या आर्थिक वर्षासाठी मंजूर रु. ३५.८० लाख इतका निधी (रुपये पस्तीस लाख ऐंशी हजार फक्त) सदर योजनेवर खर्च करण्यासाठी संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी हे संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे हे राहतील. सदरहू निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकारी यांनी दक्षता घ्यावी. उपरोक्त निधीचे जिल्हानिहाय वाटप करण्यास संचालक, सामाजिक वनीकरण यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. जिल्हानिहाय तरतुद वितरणाची माहिती शासनास पाठविण्यात यावी. राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाचा व झालेल्या खर्चाचा तपशील शासनास सादर करावा.

४. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

**मागणी क्र.एल-३, २४०६ वनीकरण व वन्यजीवन पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना- (०४)(०५) वनीकरणाद्वारे सागरी किनारपट्टीचे संरक्षण (२४०६ २३१२)-योजनांतर्गत - दत्तमत**

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक - **२०११०३१५१६५२५९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

**( श्या. र. चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,
संचालक, सामाजिक वनीकरण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
सर्व सहसंचालक , सामाजिक वनीकरण वृत्त, कोकण ठाणे, पुणे, नाशिक, औरंगाबाद, अमरावती, नागपूर .
उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, ठाणे, रायगड, रत्नागिरी, व सिंधुदुर्ग.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
महालेखापाल, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे, रायगड, रत्नागिरी, सिंधुदुर्ग.
कार्यासन अधिकारी, व्यय-१५,अर्थसंकल्प ३ व ४, वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई-३२
कार्यासन अधिकारी, कार्यासन क्र.१४३२, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
सहसचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी (सर्व) , ग्रा.वि.व ज.सं.वि.,मंत्रालय,मुंबई-३२
निवडनस्ती/जल-१२.